मागासवर्गीय अनुदानित वसतिगृह मान्यता व अनुदान योजना बंद वसतिगृहे इतर संस्थांना हस्तांतरीत व स्थलांतरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीसीएच-२०१४/प्र.क्र.०२/शिक्षण २
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई -४०० ०३२
दिनांक : १२ ऑगस्ट, २०१४

वाचा -

१) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्रमांक: बीसीएच-१०९७/प्र.क्र.१०७/मावक-४, दि.१६.०३.१९९८
२) शासन शुध्दीपत्रक : सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीसीएच-२०००/प्र.क्र.२९७/मावक-४, दि.०१.०८.२००८
३) आयुक्त समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.१४९ दि.२९.०४.२०११

प्रस्तावना -

स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलांमुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देण्याची योजना संदर्भाधीन शासन निर्णय दि.१६.०३.१९९८ अन्वये राबविण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत राज्यात २३८८ अनुदानित वसतिगृहांना मान्यता देण्यात आली आहे. पूजा शिक्षण संस्था,हिंगणघाट, ता.हिंगणघाट, जि.वर्धा संचलित सौ.मीराबाई मंहतारे मुलांचे वसतीगृह, काजळसरा, ता.हिंगणघाट, जि.वर्धा या वसतिगृहामध्ये गंभीर त्रुटी आढळून आल्यामुळे सदर वसतिगृहाची मान्यता रद्द करण्यात आली आहे. याकरिता मुलींच्या वसतीगृहाची ज्या ठिकाणी मागणी आहे व तेथील मुलींना शिक्षणाच्या संधी उपलब्ध व्हाव्यात यास्तव उपरोक्त शासन निर्णयातील तरतुदीनुसार सदरहू बंद वसतिगृह मुलींच्या वसतीगृहात रुपांतरीत करुन इतर पात्र संस्थेस हस्तांतरीत व स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

याबाबत सांगोपांग विचार करून स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलांमुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देणे या योजनेअंतर्गत पूजा शिक्षण संस्था,हिंगणघाट, ता.हिंगणघाट, जि.वर्धा संचलित सौ.मीराबाई मंहतारे मुलांचे वसतीगृह, काजळसरा, ता.हिंगणघाट, जि.वर्धा हे बंद पडलेले वसतिगृह नृसिंह आदिवासी विकास संस्था, कुर्ली, ता.घाटंजी, जि.यवतमाळ या संस्थेस हस्तांतरीत करून मौजे कुर्ली, ता.घाटंजी, जि.यवतमाळ, या ठिकाणी चालवण्यासाठी शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

२ सदर अनुदानित मागासवर्गीय मुलांचे वसतिगृह मुलींच्या वसतिगृहात परावर्तीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यामुळे सदर संस्थेस मुलींचे वसतिगृह चालु करणे बंधनकारक राहील.

३. सदर संस्थेस हस्तांतरीत व स्थलांतरीत केलेल्या वसतिगृहाची मान्यता सन २०१४-१५या शैक्षणिक वर्षापासुन राहील व एकूण मान्यसंख्या २४ इतकी राहील.

४. सदर संस्थेस स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलांमुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देणे या योजनेचे अस्तित्वात असलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१२१३४४३४०७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2014.08.13 16:23:15 +05'30'

**डॉ.वसंत माने**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नागपूर/यवतमाळ
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा/यवतमाळ,
४. जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा/यवतमाळ
५. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा/यवतमाळ,
६. महालेखापाल(लेखापरिक्षा/लेखाअनुज्ञेयता) महाराष्ट्र ½, मुंबई, नागपूर
७. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव/ अध्यक्ष, पूजा शिक्षण संस्था,हिंगणघाट, ता.हिंगणघाट, जि.वर्धा
१०.सचिव/ अध्यक्ष, नृसिंह आदिवासी विकास संस्था, कुर्ली, ता.घाटंजी, जि.यवतमाळ
११. निवड नस्ती.